GR-200408051526500001-1201

जिल्हा परिषद शाळांमधील शिक्षकांना वरिष्ठश्रेणी /निवडश्रेणी लागू करण्याबाबत सर्व समावेशक सूचना.

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक-डीएसआर २०००/प्र.क्र.१६१/१८,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२,दिनांक: ३१ मे २००१.

वाचा : १) शासन आदेश ,ग्रा.वि.वि. क्रमांक- डीएसआर२४८९/२१२६/ प्र.क्र.५२७/१८, दिनांक ४ एप्रिल १९९०.
२) शासन आदेश ,ग्रा.वि.वि. क्रमांक- डीएसआर२४९३/प्र.क्र.२०५७/१८, दिनांक २९ जूलै १९९३.
३) शासन निर्णय ग्रा.वि.वि.क्रमांक- डीएसआर २४९९/प्र.क्र.२०८/९८/१८, दिनांक ११ जानेवारी १९९९.
४) शुध्दीपत्रक ग्रा.वि.वि.क्रमांक- डीएसआर १०९९/प्र.क्र.६९/१८, दिनांक १७ मे, १९९९.
५) शासन निर्णय ,ग्रा.वि.वि.क्रमांक- डीएसआर ८९९/प्र.क्र.१३१/९९/१८, दिनांक १ सप्टेंबर १९९९.

**शासन निर्णय :**

या विभागाच्या वरील संदर्भ ५ मधील दिनांक १ सप्टेंबर १९९९ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा परिषद सेवेतील वर्ग-३ व वर्ग-४ च्या कर्मचा-यांसाठी सुधारित वेतनश्रेण्या मंजूर करण्याबाबत सर्व समावेशक आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील जिल्हा विकास सेवा (गट- क) शिक्षण श्रेणी-२ अंतर्गत( जिल्हा परिषद शाळांतील शिक्षकांच्या) काही पदांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणी लागू करण्यात आलेल्या आहेत. परंतु त्या पदांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणी लागू करण्याबाबतच्या अटी प्रस्तुत शासन निर्णयात नमूद केलेल्या नाहीत.विभागाच्या वरील संदर्भ १ व २ मधील शासन निर्णयानुसार जिल्हा परिषद शाळांमधील शिक्षकांना वरिष्ठश्रेणी व निवड श्रेणी लागू केलेल्या असून, त्यामध्ये ह्या श्रेणीस पात्र होण्याकरिता अटीही नमूद केलेल्या आहेत.जिल्हा परिषदेतील

सेवा समवेतक

शिक्षकीय कर्मचा-यांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणी लागू करण्या संदर्भातील अटी व शर्ती विहित करण्याचा प्रश्न काही काळ शासनाच्या विचाराधीन होता.

या संदर्भात आता महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील कलम २४८ च्या परंतुकानुसार तसेच उपलब्ध असलेल्या अन्य अधिकारानुसार शासन आदेश देत आहे की, जिल्हा परिषदेकडील शिक्षकांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीस पात्र होण्यासाठी ज्या अटी वरील संदर्भ - २ च्या शासन निर्णयान्वये विहित केल्या आहेत त्याच अटी काही फेरबदलासह लागू करण्यात याव्यात. यापुढे जिल्हा परिषद माध्यमिक शाळांतील मुख्याध्यापकांच्या सध्याच्या पटसंख्येवर आधारित सुधारित वेतनश्रेणीतील दोन प्रवर्गाऐवजी एकच प्रवर्ग असेल व त्यांना १२ वर्षाच्या त्या पदावरील अर्हताकारी सेवेनंतर वरिष्ठ श्रेणी मिळेल.त्यांचेबाबतील निवड श्रेणी राहणार नाही.

२. वरील संदर्भ ५ मधील शासन निर्णयात जिल्हा विकास सेवा (गट-क) शिक्षण श्रेणी -२ अंतर्गत जिल्हा परिषदेकडील शिक्षकांच्या ज्या पदांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणी दर्शविण्यात आलेली आहे त्या पदांना वरिष्ठ श्रेणी व निवड श्रेणीस पात्र होण्यासाठी पुढील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील :-.

१. वरिष्ठ श्रेणीत पात्र होण्यासाठी उमेदवाराला खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

(अ) प्रशिक्षित अर्हतेसह १२ वर्षाची अर्हताकारी सेवा

(ब) या कामासाठी नियुक्त केलेल्या समितीला उमेदवाराचे कामकाज समाधान-कारक वाटणे.

(क) विभागाने विहित केलेले किमान तीन आठवड्याचे सेवा अंतर्गत प्रशिक्षण पूर्ण करणे अट "ब" मधील कार्याचे मूल्यमापनासाठी निर्माण केलेल्या समितीवर जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे अध्यक्ष,जिल्हा परिषदेचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक)हे सदस्य व जिल्हा परिषदेचे शिक्षणाधिकारी (माध्यमिक) हे सदस्य सचिव राहतील.

या समितीची बैठक आवश्यकतेनुसार वर्षातून एक किंवा अधिक वेळा बोलावून वरिष्ठ श्रेणीसाठी जेष्ठतेनुसार पात्र शिक्षकांचे काम समाधानकारक आहे किंवा कसे याबाबतचा निर्णय घेतील, असा निर्णय अंतिम असून त्यावर अपील करता येणार नाही. काम

समाधानकारक आहे किंवा कसे याबाबतचे प्रमाणपत्र देताना प्राथमिक शिक्षक व मुख्याध्यापक यांचे निकट पूर्वीचे ३ वर्षाचे गोपनीय अभिलेख विचारात घ्यावयाचे आहेत.

२. निवडश्रेणी त्या त्या संवर्गातील वरिष्ठ श्रेणीतील २० टक्के पदांना सेवा जेष्ठतेनुसार अनुज्ञेय होईल व त्या संवर्गातील किमान ५ पदे वरिष्ठ श्रेणीत असणा-या प्रवर्गाचा निवडश्रेणीसाठी विचार केला जाईल. निवड श्रेणीस पात्र होणा-या उमेदवारास खालील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील :-

अ) वरिष्ठ श्रेणीत १२ वर्षाची अर्हताकारी सेवा पूर्ण केली असली पाहिजे.

ब) शासन विहित करील असे सेवांतर्गत प्रशिक्षण पूर्ण केलेले असले पाहिजे.

क) (१) प्राथमिक शिक्षकांसाठी प्रशिक्षण पदवीधारकांची अर्हता मिळविली असली पाहिजे.

(२) प्राथमिक शाळेतील मुख्याध्यापकांसाठी पदव्युत्तर प्रशिक्षित शिक्षकांची अर्हता प्राप्त केली असली पाहिजे.

(३) माध्यमिक शाळेतील प्रशिक्षित अपदवीधर शिक्षकांसाठी पदवी व पदवीधर शिक्षकांसाठी पदव्युत्तर प्रशिक्षित शिक्षकांचीअर्हता प्राप्त केली असली पाहिजे.

वरिष्ठ व निवड श्रेणीस पात्र होण्यासाठी वरील अटी खेरीज, शिक्षण व सेवा योजन विभागाने त्यांच्या शासन निर्णय क्रमांक चवेआ १०८९/१७६/माशि-२, दिनांक १५/१/१९९० नुसार सेवांतर्गत प्रशिक्षणाबाबत ज्या सवलती व अटी विहित केल्या आहेत त्या जिल्हा परिषदेमधील प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांनाही लागू केलेल्या आहेत. तसेच विभागाने वरिष्ठ व निवड श्रेणीबाबत पूर्वी वेळोवेळी शासन निर्णय/परिपत्रक इत्यादीव्दारे निर्गमित केलेल्या सुधारणा आदेशातील तरतुदी लागू होतील.

३. प्राथमिक शाळेतील शिक्षक व माध्यमिक शाळेतील प्रशिक्षित शिक्षकांना, वरिष्ठ श्रेणीतील १२ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर, निवड श्रेणी परिच्छेद-२ (२) (क)येथे नमूद केलेल्या शैक्षणिक अर्हता प्राप्त करण्याच्या अटीवर अनुज्ञेय आहे. ज्या शिक्षकांची सलग सेवा १८ वर्षे व त्यापेक्षा जास्त झाली असेल अशा शिक्षकांना पुढील उच्च श्रेणीसाठी म्हणजेच निवड श्रेणीसाठी विहित केलेली शैक्षणिक अर्हता मिळविण्यापासून सूट मिळू शकेल. तथापि,

ज्यांनी " १८ वर्षे पूर्ण " एवढी सेवा केली नसेल अशा शिक्षकांना त्यांना विहित शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्याशिवाय त्यांचा पुढील श्रेणीसाठी विचार करता येणार नाही.

४. १२ वर्षाच्या प्रशिक्षित अर्हतेसह झालेल्या सलग सेवेनंतर मुळ वेतन श्रेणीतील पुढील वरिष्ठ श्रेणीमध्ये/निवडश्रेणीमध्ये वेतन निश्चिती करण्यांत येईल. ही वेतन निश्चिती करताना शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक वेतन-१२८९/प्र.क्र.४६/सेवा-३, दिनांक ३ एप्रिल,१९९० व वित्त विभागाकडील शासन परिपत्रक क्रमांक वेतन १२८९/प्र.क्र.४६/सेवा ३ दिनांक १९ जून,१९९० मधील तरतुदीचा वापर करावा.

५. हा शासन निर्णय शालेय शिक्षण विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २६६/सेवा १० दिनांक ७/०४/२००१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ल. पां. कालिबाग)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. महालेखापाल- १ (लेखा व अनुज्ञेयता) व (लेखा परिक्षा) महाराष्ट्र,मुंबई,
२. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) व (लेखा परिक्षा) महाराष्ट्र,नागपूर,
३. मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी हिशेब,मुंबई,
४. उप मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी हिशेब,मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती.
५. सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
६. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
७. सर्व जिल्हा परिषदेचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
८. सचिव,ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
९. वित्त विभागातील कार्यासन क्र.सेवा १०,
१०. शालेय शिक्षण विभाग (माशि-२)
११. कक्ष अधिकारी,का.क्र.०८,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
१२. निवड नस्ती,कार्यासन क्र.१८,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
१३. परिषद शिक्षणाधिकारी,सर्व जिल्हा परिषदा.